**वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणासाठी मे. महाआयटी यांना अदा करावयाची रक्कम संक्षिप्त देयकावर काढण्यास मंजूरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०१९/४७७/प्र.क्र.१४१/ग्रा.सं.-३**

दुसरा माळा, मंत्रालय (विस्तार),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १९ मार्च, २०२०

वाचा - १) शासन निर्णय, क्रमांक - वैमाशा-२०२०/प्र.क्र.२६/ग्रासं-३, दिनांक १७ मार्च, २०२०

२) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई यांचे पत्र क्र. वैमाशा/संगणकीकरण/टीएसपी/खर्चास मंजूरी/२०२०/१३१, दि.३०.०१.२०२०

**प्रस्तावना:-**

वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणाचे काम मे. महाआयटी यांच्यामार्फत करण्यात येत आहे. सदर प्रकल्पासाठी येणाऱ्या खर्चाच्या अनुषंगाने मे. महाआयटी यांनी दि.२५.०२.२०२० रोजी रू.२,२६,५१,६९४/- इतक्या रक्कमेचे प्रोफॉर्मा इनव्हॉईस सादर केले आहे. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणासाठी रू.२,२६,५१,६९४/- एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रानुसार वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणांतर्गत मे. महाआयटी यांना पार्ट पेमेंट म्हणून रू.२५ लाख इतकी रक्कम अदा करावयाची आहे. तथापि, सदर रक्कम नियमित देयकावर अदा करणे शक्य नसल्याने रू.२५ लाख निधी संक्षिप्त देयकावर काढण्यास मंजूरी देण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय

वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरणासाठी मागणी क्र. एम-३, मुख्य लेखाशिर्ष ३४७५- इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा, १०६, वजने व मापे यांचे विनियमन- (००) (०१) वजने व मापे विनियमन (३४७५ ००९३), १७- संगणक खर्च या लेखाशिर्षाखाली मंजूर निधीतून मे. महाआयटी यांना अदा करावयाचा रू.२५ लाख इतका निधी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून संक्षिप्त देयकावर काढण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.-

१) शासन परिपत्रक क्र.मुंविनि १०१७/प्र.क्र.३८/१७/विनियम, दि.१८.१२.२०१७ मधील सूचनेनुसार (३४७५ ००९३)-१७ संगणक खर्च या लेखाशिर्षाखालील दि.३१.०१.२०२० यापूर्वीची तपशिलवार देयके प्रलंबित नाहीत.

२) दि.३१.०१.२०२० नंतर संक्षिप्त देयकावर काढलेल्या सर्व तपशिलवार देयकांचा त्वरेने निपटारा करण्यात येईल.

३) या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

४) खर्च नियमित देयकाद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

५) या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची जबाबदारी सहायक नियंत्रक (लेखा), वैध मापन शास्त्र, मुख्यालय, मुंबई यांची राहील.

६) मासिक निधी विवरणपत्रानुसार याकरीता निधी उपलब्ध आहे.

२. सदर प्रयोजनार्थ नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांना नियंत्रक अधिकारी व त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी सदर निधी मे. महाआयटी यांना अदा करावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६७/२०२०/विनियम, दि.१६.०३.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२००३१९१७११४२९६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUREST DNYANDEO REDEKAR

Digitally signed by SURESH DNYANDEO REDEKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=00b6deeb0e386eb5698cc129016108429cd770a158e87c3a2a96134dccfff610, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=b0c49d4a2d63d7827dd22b5ccbfc134f691b42353bcee54455b220aff75b429c, ou=FOOD SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SURESH DNYANDEO REDEKAR
Date: 2020.03.19 17:16:00 +05'30'

**(सु.ज्ञा.रेडेकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ व २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ (लेखा परिक्षा), मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
६. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
७. वित्त विभाग ( विनियम/ व्यय १०), मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती (ग्रासं. ३)